**मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण योजना (Post War Rehabilitation -२१९) या योजनेतील अट केवळ नाईक नगर को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी लि. कुर्ला (पूर्व) मुंबई या सोसायटीच्या पुनर्विकासाकरीता शिथील करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.गृहनि-२०२४/प्र.क्र.४६/बांधकामे**
पहिला मजला, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ मार्च, २०२४.

**वाचा:-** शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.गृहनि -२०२३/प्र.क्र.१६/ बांधकामे, दि.३१.०५.२०२३

**प्रस्तावना:-**

नाईक नगर को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी लि. कुर्ला (पूर्व) मुंबई येथे दि.२७.६.२०२२ रोजी सोसायटीची इमारत दुर्घटनाग्रस्त झाली व इमारतीतील जवळजवळ १९ लोकांचा या दुर्घटनेत दुर्देवी मृत्यू झाला. या दुर्घटनाग्रस्त इमारतीच्या पुनर्विकासाच्या मागणीच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.१ येथील विभागाच्या दि.३१.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ येथील (iii) येथील" पुनर्विकास प्रस्ताव तयार करताना झोपडपट्टी पुनर्विकास योजना (S.R.A.) व प्रकल्पग्रस्तांना (Project Affected Persons)(P.A.P.) गृहसुविधा उपलब्ध करून देण्यासाठीच्या पुनर्विकास प्रकल्पांची मागासवर्गीय गृहनिर्माण संस्था (Post War Rehabilitation-२१९) या योजनेंतर्गत करावयाच्या पुनर्विकास प्रकल्पांशी सांगड घालता येणार नाही " या अटीमध्ये विशेष सूट मिळणेबाबत इमारतींच्या पुनर्विकासासाठी Post War Rehabilitation-२१९ योजनेंतर्गत येणाऱ्या दुर्घटनाग्रस्त, नाईक नगर को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी लि. कुर्ला (पूर्व) मुंबई या सोसायटीच्या पुनर्विकासासंदर्भातील प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. उपरोक्त प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागाच्या दि.३१.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ येथील (iii) येथील " पुनर्विकास प्रस्ताव तयार करताना झोपडपट्टी पुनर्विकास योजना (S.R.A.) व प्रकल्पग्रस्तांना (Project Affected Persons)(P.A.P.) गृहसुविधा उपलब्ध करून देण्यासाठीच्या पुनर्विकास प्रकल्पांची मागासवर्गीय गृहनिर्माण संस्था (Post War Rehabilitation-२१९) या योजनेंतर्गत करावयाच्या पुनर्विकास

प्रकल्पांशी सांगड घालता येणार नाही ” ही शासन निर्णयातील अट, केवळ नाईक नगर को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी लि. कुर्ला (पूर्व) मुंबई या सोसायटीच्या पुनर्विकासासंदर्भात शिथील करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१६१५५३४००३२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2024.03.16 16:36:01 +05'30'

( अनिल आहिरे )
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई, महाराष्ट्र राज्य,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
३. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र राज्य,
४. मा. सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक तथा उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (MHADA), मुंबई,
८. जिल्हाधिकारी,मुंबई/मुंबई उपनगर
९. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, मुंबई विभाग
१०. सहायक आयुक्त, समाज कल्याण,मुंबई/मुंबई उपनगर
११. अध्यक्ष/सचिव, नाईक नगर कोमुंबई ,कुर्ला ,ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी-
१२. निवडनस्ती (बांधकामे).